नवीन सार्वजनिक ग्रंथालयांना शासन मान्यता देणे व कार्यरत असलेल्या सार्वजनिक ग्रंथालयांना दर्जावाढ देणे यासाठी सुधारित निकष लागू करणे

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
शुध्दिपत्रक क्रमांक मराग्रं २००८ (४२५/०८) साशि-५
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३०ऑक्टोबर, २०१०

**वाचाः** १) शा. नि. क्र. मराग्रं २००६/(१२२ /०६) साशि- ५ दि. १५ सप्टेंबर २००६
२) शुध्दिपत्रक क्र. मराग्रं २००६/(१२२ /०६) साशि- ५ दि. २५ सप्टेंबर २००६
३) शा. नि. क्र. मराग्रं २००६ (१२२/०६) साशि- ५ दि. ०७ ऑक्टोंबर २००६
४) शा. नि. क्र. मराग्रं २००६ (१२२/०६) साशि- ५ दि. २९ ऑक्टोंबर २००७
५) संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची दि. ६/८/२००८, १५/९/२००८, २०/१०/२००८ ची पत्रे.

शुध्दीपत्र :-

उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०७/१०/२००६ च्या शासन निर्णया मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे,

१. शासन निर्णया सोबतच्या प्रपत्र "अ" मधील, अ.क्र. ५ रद्द करण्यात येत आहे आणि प्रपत्रातील अ.क्र. १, पुढीलप्रमाणे वाचावा :-

(अ) ग्रंथालयांच्या "ड" वर्गासाठी किमान रु. २५,०००/- इतक्या रकमेची ३०० ग्रंथसंख्या ग्रंथालयाच्या मालकीची असल्यास.(बालवाङ्मय २० % पर्यंत आवश्यक) गुण :- २०
(ब) वरील (अ)येथील नमुद रक्कम व ग्रंथसंख्या दुप्पट असल्यास गुण :- १५

[(अ) आणि (ब) येथील सर्व ग्रंथांवर ग्रंथालयाचा शिक्का मारलेला असावा व ग्रंथांची नोंद दाखल नोंदवहीत असावी.]

२. शासन निर्णया सोबतच्या प्रपत्र "ब" मधील, अ.क्र. ५, रद्द समजण्यात यावा आणि, प्रपत्रातील अ.क्र. २ करीता असलेल्या २५ गुणांऐवजी ३० गुण असतील.

३. हे शुध्दिपत्रक निर्गमित होण्याच्या पूर्वीच्या, मान्यताप्राप्त सार्वजनिक ग्रंथालयाच्या कार्यकारिणीमध्ये बाहेरगावचे सदस्य असल्यास, त्या ग्रंथालयाचा सर्व कार्यभार स्थानिक सदस्य असलेल्या कार्यकारी मंडळाकडे सोपविण्याबाबतची कार्यवाही, अस्तित्वात असलेल्या कार्यकारी मंडळाने आर्थिक वर्ष २०१०-११ मध्येच पूर्ण करावी. अन्यथा अशा ग्रंथालयाचे अनुदान प्रथमतः थांबविण्यात यावे, व तद्नंतर नियमातील विहित पध्दतीने शासन मान्यता रद्द करण्यात यावी. संपूर्ण कार्यकारीणी स्थानिक असणे, हा पात्रतेचा निकष राहील.

४.	सदर शुध्दिपत्रक शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक 201011011341090001असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

(पु.हि.वागदे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री (उवतंशि) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. सचिव (उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक
६. संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७, महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई/ महाराष्ट्र २, नागपूर
९. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १, मुंबई/ महाराष्ट्र २, नागपूर
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी
१३. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ, व्दारा १७२, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग, नायगांव, दादर, मुंबई ४०० ०१४
१४. निवड नस्ती साशि-५